वेगवेगळ्या योजना बंद झाल्यामुळे कमी करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना पर्यायी नोकरी उपलब्ध करण्याबाबत-कालमर्यादा वाढविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक: एईएम-१०८५/२३७८/सीआर-८१/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ९ जुन १९८६.

वाचा :- १] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०८१/३६५८/७३/१६-अ, दिनांक १४. ४. १९८२.

२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०८२/०/सीआर-१०३/१६-अ, दिनांक १२. १२. १९८३.

३] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०८४/०/के. नं. ५५/१६-अ, दिनांक १३. २. १९८५.

शासन निर्णय :-

या शासन निर्णया सोबतच्या जोडपत्रात नमूद केलेल्या योजनातून वेळोवेळी कमी करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना ते शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०८४/०/के. नं. ५५/१६-अ, दिनांक १३. २. १९८५ मधील अटींची पूर्तता करीत असल्यास त्यांचेबाबतीत पर्यायी नोकरीत सामावून घेण्याचा कालावधी दिनांक ३१. १२. १९८६ पर्यंत वाढविण्यास शासन मंजूरी देत आहे. ज्या जिल्ह्यांमध्ये कमी करण्यात आलेले कर्मचारी उपलब्ध आहेत त्याच जिल्ह्यांकरिता हे आदेश लागू होतील.

२. हे आदेश वित्त विभागाच्या अनुमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : सीआर-९८९/व्यय-४ दिनांक ८. ५. १९८६ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव,

सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई [पत्राने],
प्रोथोनोटरी अँन्ड सिनियर मास्टर, हायकोर्ट, मुंबई [पत्राने],
रजिस्ट्रार, हायकोर्ट [अपीलेट साईड], मुंबई [पत्राने],
प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई [पत्राने],
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई [पत्राने],
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर,
उप महालेखापाल, भविष्य निर्वाह निधी कक्ष, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
जिल्हाधिकारी, नांदेड, नागपूर, नाशिक, औरंगाबाद, वर्धा,
मुंबई, बुलढाणा, धुळे, सांगली, यवतमाळ,
उद्योग संचालक, मुंबई,
कृषि संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
इतर सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय
प्रमुख,
वित्त विभाग,
सार्वजनिक बांधकाम विभाग,
महसूल व वन विभाग,
निवड नस्ती.

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एईएम-१०८५/२३७८/सीआर-८१/१६-अ, दिनांक ९ जून १९८६ चे जोडपत्र

| अ. क्र. | ज्या योजनेतून कमी करण्यात आलेल्यांना पर्यायी नोकरीत सामावून घ्यावयाचे आहे त्या योजनेचे नाव | योजना मंजूर करण्यासंबंधीच्या आदेशाचा क्रमांक व दिनांक | ज्या जिल्ह्यासाठी योजनेचा कालावधी वाढविण्यात येत आहे त्या जिल्ह्यांची नावे |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | जनगणनेच्या कामावरून कमी करण्यात आलेले कर्मचारी. [१९७१ ची जनगणना] | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एईएम-१०७३/मेड, दिनांक ६ मार्च १९७३. | औरंगाबाद, नागपूर. |
| २. | लघु उद्योग घटक गणना योजनेतील कर्मचारी. | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एईएम-१०७४/३०२४३/जे-२, दिनांक ३१ डिसेंबर १९७४. | नांदेड, नाशिक. |
| ३. | उद्योग संचालनालयाच्या अधिपत्याखालील औद्योगिक प्रशिक्षण केंद्रातून कमी करण्यात आलेले कर्मचारी. | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एईएम-१०७५/३०२४३/जे-२, दिनांक २ जानेवारी १९७५. | नांदेड. |
| ४. | टंचाई कामावरून कमी करण्यात आलेले लिपिक-वर्गीय व मस्टर कारकून वगैरे कर्मचारी. | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एईएम-१०७३/२४२१/जे-२, दिनांक ७ जानेवारी १९७४. | नाशिक, नागपूर, बुलढाणा, धुळे, नांदेड, यवतमाळ व औरंगाबाद. |